**समयमर्यादा**

**महाराष्ट्र विधान मंडळाच्या लोकलेखा समितीला लेखा परीक्षा अहवालांवरील शासनाची स्पष्टीकरणात्मक ज्ञापन व तत्संबधीची अद्ययावत माहिती विनाविलंब उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः भानिम - २०१४ / प्र.क्र.१३७ / लोलेस**

मंत्रालय
मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ जून ,२०१५

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक लोलेस १०/२०००/१८६ /प्रक्र. ४ / दोन, दिनांक १५.०९.२०००.
२) परिपत्रक वित्त विभाग क्र. भानिम - १२०० / प्र.क्र. २०५ /लोलेस, दि. १८ जानेवारी, २००१.

**प रि प त्र क**

महाराष्ट्र विधान मंडळाच्या लोकलेखा समितीला लेखापरिक्षा अहवालांवरील शासनाची स्पष्टीकरणात्मक ज्ञापने व तत्संबंधीची अद्ययावत माहिती विनाविलंब उपलब्ध करुन देण्याबाबत शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.भानिम - १२००/प्र.क्र.२०५/लोलेस, दि. १८ जानेवारी, २००१ अन्वये सर्व मंत्रालयीन प्रशासकिय विभागांना सूचना देण्यात आलेल्या असून त्या कायम आहेत.

भारतीय राज्य घटनेच्या कलम १४९ आणि १५१ अन्वये आणि भारताचे नियंत्रक आणि महालेखापरिक्षक ( C & AG ) यांच्या ( कर्तव्ये, अधिकार आणि सेवाशर्ती ) अधिनियम १९७१ अन्वये C & AG लेखापरिक्षणाचे अधिकार प्राप्त झाले आहेत. महाराष्ट्र शासनाच्या विभागांच्या खर्चाचे लेखापरिक्षण C & AG (DPC) अधिनियमाच्या कलम १३[1] प्रमाणे करण्यात येते. C & AGs अधिनियम १९७१ च्या कलम १९(२)[2], १९(३)[3], आणि २०(१)[4] नुसार लेखापरिक्षण होत असलेल्या ८ स्वायत्त संस्थांचे C & AG हे एकमेव लेखापरिक्षक आहेत. या व्यतिरिक्त, शासनाने ज्यांना भरीव निधी दिला आहे अशा ८७८ इतर संस्थाचे / प्राधिकरणांचे लेखापरिक्षण C & AG अधिनियमाच्या कलम १४[5] अन्वये करतात. विविध लेखापरिक्षणाची तत्वे आणि कार्यपद्धती C & AG ने निर्गमित केलेल्या लेखापरिक्षण मानके आणि लेखापरिक्षण आणि लेख्यांची विनियमावली, २००७, मध्ये विहित केली आहेत.

भारताचे महालेखापरिक्षक ( Comptroller and Auditor General - (CAG) यांचेकडून नियुक्त केल्या गेलेल्या पथकाकडून मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रिय कार्यालयाचे लेखापरिक्षण ( Audit ) केले जाते. सदर लेखापरिक्षणात घेण्यात आलेल्या आक्षेपांच्या अनुषंगाने संबंधिताना प्रारुप परिच्छेद पाठविले जातात. सदर प्रारुप परिच्छेदांचे उत्तर ( स्पष्टीकरणात्मक ज्ञापने ) विहित केलेल्या मुदतीत ( सहा आठवडयाच्या आत ) महालेखापाल, मुंबई/ नागपूर कार्यालयास पाठवावयाचे असते. विहित मुदतीत प्रारुप परिच्छेदाचे उत्तर महालेखाकार, मुंबई / नागपूर कार्यालयास न पाठविल्यास सदरचा परिच्छेद महालेखाकार, मुंबई / नागपूर कार्यालयाकडे तयार होणाऱ्या अहवालांमध्ये अंतर्भूत केला जातो आणि तो अहवाल भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांच्या स्वाक्षरीने विधीमंडळाच्या पटलावर ठेवण्यासाठी शासनास पाठविण्यात येतो.

लोकलेखा समिती विधानमंडळ सचिवालयाच्या " बारावी महाराष्ट्र विधानसभा विसावा अहवाल " यामध्ये समितीने विविध परिच्छेदांवर शिफारशीं केल्या आहेत. त्यात शिफारस क्र. ७.१२३ मध्ये समितीने प्रशासकीय विभागांना खालीलप्रमाणे सूचना केल्या आहेत.

" महालेखाकारांनी परिच्छेदांतील आक्षेपांची पूर्तता करुन घेण्यासाठी संबंधित विभागाला कालमर्यादा ठरवून दिलेली असते त्या कालावधीत संबंधित अधिकाऱ्यांनी महालेखाकाराकडून परिच्छेदातील आक्षेपांची पूर्तता करुन घेतली पाहिजे सबंधित विभागांच्या अधिकाऱ्यांनी हे काम वेळेत पूर्ण केले तर समितीचे काम कमी होईल. मुदतीनंतर खुलासा केल्यामुळे महालेखाकारांकडून आपल्याकडे परिच्छेद येतो. ज्यावेळी समिती संबंधित विभागाच्या सचिवांची साक्ष घेते त्यावेळी समितीला उत्तर दिले जाते की,

महालेखाकारांचे समाधान झालेले आहे. यासाठी दंडात्मक कारवाई नाही किंवा वेळेत केले पाहिजे असे तुमच्यावर बंधन नाही. ज्यावेळी समिती प्रश्न विचारते त्यावेळी वेळ निघून गेलेली असते. प्रधान सचिवांना माहिती आहे की, ही एक पद्धत आहे ".

" महालेखाकार कार्यालयाकडून संबंधित अधिकाऱ्यांना एक - दोन वेळा चर्चेसाठी बोलाविले जाते. त्यावेळी संबंधित अधिकाऱ्यांनी परिच्छेदांची पूर्तता करुन घेतली नाही तर महालेखाकार त्यांचा अहवाल सादर करतात. तो अहवाल लोकलेखा समितीकडे येतो. संबंधित विभागाच्या सचिवांना साक्षीसाठी बोलावितो व किरकोळ परिच्छेदावर सुद्धा सचिवांना साक्ष द्यावी लागते असे मत व्यक्त करुन समितीने नाराजी व्यक्त केली. त्यामुळे शासनाच्या प्रत्येक विभागाने परिच्छेद अहवालात समाविष्ट होण्यापूर्वी जास्तीत जास्त परिच्छेद निकाली काढावेत." लोकलेखा समितीच्या वरील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

त्यानुषंगाने सर्व विभागांनी प्रारुप परिच्छेद प्राप्त होताच विहित मुदतीत त्याविषयीचे अनुपालन यथास्थित महालेखापाल कार्यालयास सर्व आवश्यक कागदपत्रांसह सादर करावे. त्यामुळे CAG यांचे अहवालात कमीत कमी परिच्छेद समाविष्ट होतील. या विषयी आवश्यक नोंद सर्व संबंधितांना घेण्याविषयी सुचना विभागांनी निर्गमित कराव्यात.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२४१५०१२८०१०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

S K Shrivastava

Digitally signed by S K Shrivastava
DN: CN = S K Shrivastava, C = IN, S = Maharashtra, O = All India Service, OU = IAS
Date: 2015.07.03 11:07:39 +05'30'

**सुधीर श्रीवास्तव**
**अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव ,मंत्रालयीन विभाग,मंत्रालय,मुंबई.
२. सर्व सह / उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग , मंत्रालय, मुंबई.
३. सर्व सह / उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. सहसंचालक, अल्पबचत संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. उप संचालक, महाराष्ट्र राज्य लॉटरी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,

**प्रत,**

१. प्रधान महालेखाकार कार्यालय, मुंबई.
२. महालेखाकार, नागपूर.
३. उप सचिव / अवर सचिव, लोकलेखा समिती, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.